# हॉलोकॉस्ट म्युझियम



लेखिका: ब्रेंडा हॉगेन

## स्मृती जागवताना...

दिनांक २२ एप्रिल १९९३. थंड, ढगाळ आणि निरुत्साही हवा. एका ऐतिहासिक क्षणाचे साक्षीदार होण्यासाठी त्या कडाक्याच्या थंडीतही हजारो लोक जमा झाले होते. अर्थात प्रसंगही तसा खास होता. त्यामुळे ह्यापेक्षाही खराब दिवस असता तरी लोकांना काही फरक पडला नसता. आज युनायटेड स्टेट्स हॉलोकॉस्ट मेमोरियल म्युझियमचा लोकार्पण सोहळा होता. हॉलोकॉस्टमधे ज्या लोकांनी आपला जीव गमावला तसेच जे लोक त्यातून बचावले त्या सर्वांच्या आदराप्रती इतका प्रचंड समुदाय लोटला होता.

उद्घाटन समारंभासाठी अमेरिकेचे राष्ट्राध्यक्ष बिल क्लिंटन आणि जगातील अनेक नेते व मान्यवर व्यक्ती उपस्थित होत्या. बिल क्लिंटन ह्यांनी जमलेल्या समुदायाला उद्देशून भाषण केले, “हे म्युझियम हॉलोकॉस्टमध्ये जे मारले गेले किंवा त्यातून जे वाचले; ज्यांच्या आठवणी इथे जतन करून ठेवल्या आहेत त्यांच्याचसाठी नाही तर प्रामुख्याने आपल्यासारख्या लोकांसाठी आहे ज्यांना ह्या भयंकर अनुभवातून जावे लागले नाही. हे म्युझियम मानवता धर्म किती महत्वाचा आहे हा धडा शिकण्यासाठी आहे.”

भाषण संपल्यावर उपस्थित लोकांनी म्युझियममध्ये आणि भूतकाळात एकत्रच प्रवेश केला. हॉलोकास्टमधून वाचलेल्या लोकांच्या मनात म्युझियम पाहताना त्या काळात अनुभवलेली भीती, दु:ख, हतबलता ह्या भावना पुन्हा उफाळून आल्या. हॉलोकास्टचा व्यक्तिगत अनुभव नसलेल्या व्यक्ती माणुसकीला काळीमा फासणाऱ्या त्या क्रूर कालखंडाच्या खुणांनी व्यथित झाले.




(अमेरिकन हॉलोकॉस्ट कौन्सिलचे अध्यक्ष बड मेयरहोफ, राष्ट्राध्यक्ष बिल क्लिंटन आणि समितीचे संस्थापक अध्यक्ष एली विजेल लोकार्पण सोहळ्याच्या दिवशी शाश्वत ज्योत पेटवताना)

हॉलोकास्टमधील लोकांनी वापरलेल्या दैनदिन वस्तू प्रदर्शनात मांडून ठेवल्या होत्या. त्यात टूथब्रश, कंगवे, छत्र्या, चप्पल आणि इतर भरपूर गोष्टी होत्या.



(संग्रहालयात येणारे पर्यटक प्रदर्शनातील चप्पलांच्या ढिगाकडे महत्वाची आठवण म्हणून पाहतात)

ह्या सामान्य गोष्टी असल्या तरी खूप महत्वाच्या होत्या कारण ते बळी गेलेल्या लोकांचे प्रतिनिधित्व करत होत्या. टूथब्रश हॉलोकॉस्टमध्ये मारले गेलेल्या अगणित आजी-आजोबांच्या आठवणी जागवत होते. कंगवे पाहून केस विंचरणाऱ्या स्त्रिया डोळ्यासमोर उभ्या राहत होत्या. खराब हवामानापासून संरक्षण करण्यासाठी म्हणून पुरुषांनी त्या छत्र्या बाळगल्या असतील का? सर्वात जास्त कहाण्या तर चप्पलांचा ढीग सांगत होता. किती विविधता होती त्यात...कामगारांच्या वहाणा, महिलांच्या उंच टाचांच्या सँडल, श्रीमंत लोकांचे महागडे बूट, लहान मुलांच्या नाजूक पायातील रंगीबेरंगी चप्पल! काही झिजलेल्या तर काही तुटलेल्या...जितकी चप्पल तितक्या हॉलोकास्टच्या बळींच्या कहाण्या.

त्या ढगाळ दिवशी सर्व पाहुण्यांच्या हृदयात तीव्र भावना उमटत होत्या. कुणी आवंढा गिळत होते, कुणाचे डोळे अखंड पाझरत होते, कुणी मूकपणे, जड अंतकरणाने एका खोलीतून दुसऱ्या खोलीत जात होते, प्रत्येकाला म्युझियमचा मुख्य उद्देश पोहचत होता: “सगळ्या मृत आणि बचावलेल्या लोकांच्या आठवणी आपण जिवंत ठेवल्या पाहिजे.”

# हॉलोकॉस्ट म्हणजे काय?

पहिले महायुद्ध (१९१४-१९१८) जर्मनी, ऑस्ट्रिया-हंगेरी, त्यांचे मित्र राष्ट्र आणि फ्रान्स, रशिया, इंग्लंड, अमेरिका, त्यांचे मित्र राष्ट्रे यांच्यात झाले. युद्धात जर्मनीचा पराभव झाल्यामुळे त्यांना कठीण परिस्थितीला सामोरे जावे लागले.

युद्धामुळे जर्मनीवरील कर्जाचा डोंगर वाढला आणि ते फेडणे जर्मनीसाठी अशक्य होते. देशाची अर्थव्यवस्था पूर्ण कोलमडून पडली होती. महागाई आकाशाला भिडली होती. ह्या सगळ्या अराजकतेसाठी कुणाला तरी दोषी धरणे गरजेचे होते. ह्यातून कोण सुटका करू शकेल ह्याची शोधाशोधही सुरु झाली.



१९२०च्या सुरुवातीला जर्मनीच्या चलनाचे पूर्ण अवमूल्यन झाले होते. जळावू लाकड जाळण्यापेक्षा नोटांचे कागद जाळणे जास्त स्वस्त होते.

नॅशनल सोशॅलिस्ट पार्टीचे सदस्य, ज्यांना नाझी म्हटले जाई, त्यांनी जर्मनीचे गतवैभव मिळवण्यासाठी मूळ वंशीय लोकांचा मुद्दा काढायचे ठरवले. त्यांच्या मते खरा जर्मन म्हणजे शुद्ध वंशाचा आर्यन. ज्याचे केस सोनेरी व डोळे निळे आहेत तोच खरा आर्य आणि खरा जर्मन. नाझींनी घोषणा केली की जर्मनीत राहण्याचा हक्क फक्त आर्यन वंशाच्या लोकांना आहे. दुसऱ्या वंशांना विशेषतः ज्यू धर्मीयांना ते हलक्या वंशांचे समजत. ह्या वाईट लोकांमुळेच आज जर्मनी संकटात सापडली आहे असा पद्धतशीर प्रचार करायला नाझींनी सुरुवात केली. त्याला बळी पडून बरेच जर्मन नाझींच्या बाजूचे झाले. आता फक्त अॅडॉल्फ हिटलरच आपला तारणहार आहे ह्यावर त्यांचा ठाम विश्वास बसला.

जर्मनीत ख्रिश्चन, लुथरन्स, ज्यू आणि अनेक धर्माचे लोक राहत होते. त्यात ख्रिश्चन बहुसंख्याक तर ज्यू अल्पसंख्याक होते. नाझींना असे वाटत होते की जर जर्मनीला पुन्हा वैभव आणि सन्मान प्राप्त करायचे असेल तर ज्यूंचा कडक बंदोबस्त करणे गरजेचे आहे. ज्यूंपासून सुटका करण्यासाठी जर्मनीने जी योजना आखली गेली त्याला फायनल सोल्युशन असे म्हणत. पुढे काही वर्षांनी त्यालाच हॉलोकॉस्ट असे म्हटले जाऊ लागले.

हॉलोकास्टमधे ६० लाख ज्यूंचा नरसंहार करण्यात आला. पण त्यांच्या यादीत फक्त ज्यूच नव्हते. तर त्या व्यतिरिक्त ५ लाख पोलिश, जिप्सी, राजकीय कैदी आणि हिटलरचे विरोधक ह्यांची हत्या करण्यात आली. काहीना विषारी वायूने, काहीना बंदुकीच्या गोळीने तर काही उपासमारीने मारण्यात आले.



ॲडॉल्फ हिटलर
(१८९९-१९४५)

हॉलोकॉस्ट काही एका रात्रीत घडले नाही. ॲडॉल्फ हिटलर सत्तेत आल्यावर हे सुरु झाले. १९३३ साली हिटलर जर्मनीचा चॅन्सलर झाला. त्याने जर्मन जनतेला सोनेरी भविष्याचे वचन दिले.

सगळे अधिकार स्वत:कडे घेण्यासाठी त्याने कायद्यात लगेचच काही बदल केले. त्याने जर्मन लोकांना पटवून दिले की गरिबी आणि हलाखीच्या परिस्थितीतून बाहेर काढायचे असेल तर त्यासाठी लागणारे सर्वोच्च अधिकार त्याच्याकडे असणे आवश्यक आहे. देशाचा कायापालट करण्याची एक संधी हिटलरला द्यायला लोक तयार होते. सगळ्या प्रसारमाध्यमांचा तसेच राजकीय सभांचा हिटलरने ताबा घेतला. इतर जर्मन नेते ते निमूट पाहत होते.

जसजसा हिटलरचा प्रभाव वाढू लागला तसतसा नाझी पार्टीचा प्रभावही वाढू लागला.



(सगळ्या वयोगटातील लोक नाझींना सलामी देताना. जर्मनीत राजकीय चळवळ अतिशय लोकप्रिय होत चालली होती)

देशाचे नेतेपद हाती आल्यावर तीनच महिन्यात हिटलरने पूर्ण सत्तेवर आपला अंकुश बसवला. हुकुमशहाचे सर्व गुण त्याच्यात होते. त्याने सामान्य जनतेवर लक्ष ठेवण्यासाठी गेस्टापो नावाची गुप्त पोलीस यंत्रणा उभारली. विरोधकांना डांबण्यासाठी तुरुंग बांधण्याचे आदेश त्याने दिले. शुद्ध आर्य राष्ट्र हे स्वप्न साकारण्यासाठीची मोहीम जोरात सुरु झाली.

१ एप्रिल १९३३ मध्ये हिटलरने ज्यूंच्या व्यापारधंद्यांवर बहिष्कार घालण्याची घोषणा केली. काही दिवसांतच जर्मन सरकारने ज्यूंना जर्मनीत काम करण्यासाठी आणि राहण्यासाठी बंधने घालणारे अनेक कायदे संमत केले. त्यानुसार ज्यू ह्यापुढे जमिनीचे मालक अथवा वृत्तपत्राचे संपादक म्हणून काम करू शकत नव्हते. त्यांना सरकारी आरोग्य विम्यातून वगळण्यात आले तसेच सैन्यात काम करण्यास बंदी घालण्यात आली.

त्याचवेळी जे लोक अनावश्यक वाटत होते त्यांचा बंदोबस्त करायचे हिटलरने ठरवले. सराईत चोर, कुविख्यात गुन्हेगार, भिकारी, बेरोजगार, दारुडे, बेघर आणि राजकीय विरोधक ह्यांच्या विरुद्ध त्याने २४ नोव्हेंबर १९३३ रोजी कायदा संमत केला. आणि त्या कायद्यानुसार ह्या सर्वांची रवानगी छळछावणीत करण्यात आली. अशाप्रकारे अनार्य लोकांपासून मुक्तता मिळवण्यासाठी मोठे पाउल उचलले गेले.

१९३८ सालामध्ये ज्यू डॉक्टरांना ज्यू नसलेल्या पेशंटची तपासणी व तसेच हिशोबनीस व दंतवैद्य म्हणून काम करण्यास पूर्ण बंदी घालण्यात आली.




(बर्लिनमध्ये एका ज्यूच्या दुकानाच्या खिडकीवर लावलेला बोर्ड, "जर्मन लोकानो, स्वतःला वाचवा! ज्यूंकडून काही घेऊ नका!)

ज्यूंनी सरकारला त्यांची संपत्ती, मालमत्ता, पैसा ह्यांची पूर्ण माहिती देणे अनिवार्य केले. तसेच १५ वर्षांवरील प्रत्येक ज्यू व्यक्तीने ओळखपत्र बाळगणे बंधनकारक केले.

पोलंडमधील काही ज्यू जर्मनीमधे राहत होते पण त्यांनी जर्मनीचे नागरिकत्व घेतले नव्हते. नाझीना जर्मनीत फक्त शुद्ध जर्मन हवे होते. सप्टेंबर १९३८ मध्ये अशा १७,००० ज्यूंना जर्मनी सोडायला सांगितले. ऑक्टोबर महिन्यात ह्या ज्यू लोकांना ट्रेनने पोलंडच्या सीमेवर सोडण्यात आले. परंतु पोलंडच्या सरकारने त्यांना देशात प्रवेश करायला परवानगी नाकारली. इतक्या साऱ्या लोकांना पुन्हा पोलंडमध्ये सामावून



(जर्मन सीमेजवळ जबोंजिन, पोलंड जवळ हजारो ज्यू अडकून पडले)

घेण्याची तयारी नव्हती. कुठे जायचे हेच त्यांना कळेना. त्यामुळे कडाक्याच्या थंडीत नाईलाजास्तव त्या ज्यूंना पोलंड आणि जर्मनीच्या सीमेवर असलेल्या छावण्यात आसरा घ्यावा लागला.

ह्या ज्यूंच्या गटामध्ये हर्शेल ग्रीन्झपान ह्याचे आई-वडीलही होते. त्यावेळी ग्रीन्झपान पॅरिसला राहत होता. आई-वडिलांना भोगाव्या लागलेल्या यातनांमुळे हर्शेल खूप संतापला. ह्या घटनेचा निषेध म्हणून उद्वेगाने त्याने जर्मन एम्बसीमधील एका अधिकाऱ्याची गोळ्या मारून हत्या केली.

ह्या घटनेचा बदला म्हणून ज्यूंवर हल्ले करायला हिटलरच्या सल्लागारांनी रस्त्यावर गुंड उतरवले. त्यांनी पूर्ण जर्मनीतील ज्यू लोकांची घरे, दुकाने, प्रार्थनास्थळे ह्यावर हल्ला केला. ह्या प्रसंगाला "क्रिस्टलनाख्त" किंवा "नाईट ऑफ ब्रोकन ग्लास" असे म्हणतात. ह्यामधे हजारो ज्यूंची घरे आणि दुकाने लुटून पेटवून दिली गेली. नाझी समर्थकांचे जत्थे ज्यूंवर हल्ले करीत रस्त्यावर फिरत होते. त्यात जबर मारहाणीमुळे १०० च्या आसपास ज्यू मृत्यू पावले. तर जवळजवळ ३०,००० ज्यूंना पकडून छळछावणीमध्ये डांबण्यात आले.



(क्रिस्टलनाख्तमध्ये हजारो ज्यू देवळे नष्ट करण्यात आली. त्यानंतर नाझींनी त्या जागेची साफसफाई करण्यासाठी ज्युंकडून जबरदस्तीने पैसे गोळा केले)

त्यानंतर १ सप्टेंबर १९३९ ला जर्मन फौजांनी पोलंडवर आक्रमण केले. ग्रेट ब्रिटन आणि फ्रान्सच्या नेत्यांनी हिटलरला तंबी दिली होती की शेजारील पोलंडवर हल्ला केला तर आम्ही त्यांच्या मदतीला येऊ. ते त्यांच्या शब्दाला जागले. ब्रिटन, फ्रान्स आणि इतर देश पोलंडच्या मदतीसाठी उतरल्याने युरोपमध्ये दुसऱ्या महायुध्याचा भडका उडाला.

इकडे पोलंडमध्ये जर्मन फौजांनी वॉर्सा, लॉडस अशा शहरातील पोलिश ज्यूंना त्यांच्या घरांमधून जबरदस्तीने घेट्टोमधे हलवले. घेट्टोच्या सभोवती तारांची काटेरी कुंपणे आणि विटांच्या उंच भिंती बांधण्यात आल्या. आतील ज्यू लोकांवर देखरेख करण्यासाठी सशस्त्र पहारेकरी तैनात केले.

तरुण वॉर्नर गाल्निक ह्याने आपल्या डायरीत घेट्टोसंबधित केलेली नोंद–"आम्हाला एक खोली- अतिशय घाणेरडी, आणि स्वयंपाकघर..तेही खूप गलिच्छ...आम्ही स्वच्छता केली आणि राहू लागलो...कामावरून येताना कुणी नजर चुकवून सोबत ब्रेड, बटर किंवा इतर काही खाद्यपदार्थ खोलीत घेऊन आले आणि नाझी सैनिकांच्या जर हे लक्षात आले तर ते त्या माणसाला गोळी मारीत किंवा तुरुंगात डांबत किंवा प्रचंड मारहाण करीत."

इतर पोलिश लोकांपासून पोलिश ज्यू सहज ओळखता यावे म्हणून नाझींनी त्यांना कपड्यावर “पिवळी चांदणी” लावण्याचा आदेश देण्यात आला.



(घेट्टोमध्ये ज्यूंच्या येण्या-जाण्यावर नाझींनी पहारा बसवला होता)

ज्यूंना दिवसभर अतिशय अंगमेहनतीची कामे करावी लागत. कामावरून घेट्टोमधे परत आल्यावर त्यांना अपुरे अन्न दिले जाई. अर्धपोटी आणि भीतीच्या छायेखाली ते कसेबसे दिवस ढकलत होते.

नोकरी, शिक्षण, मालमत्ता, जमीन, पैसा सगळे काही ह्या पोलिश ज्यूंनी गमावले होते. जर्मनीच्या अधिपत्याखाली असलेल्या इतर देशांमधील ज्यूंच्या जगण्यावरही अनेक जाचक अटी घालण्यात आल्या होत्या.

नाझींचा छळ भोगणाऱ्याना वाटे की ह्यापेक्षा अजून काय वाईट दिवस असू शकतात! त्यांना वाटे की सहन केले तर कदाचित हे सगळे थांबेल. त्यांनी ऑशविट्ज़, बुचेनवाल्ड, डचाऊ, बर्गन-बेल्सन ह्या शहरांची नावेही कधी ऐकली नव्हती.

## छळछावण्यांची उभारणी

युरोप आणि आशियामध्ये दुसऱ्या महायुद्धाचा जोर वाढू लागला. त्यामुळे जर्मनीला रस्तेबांधणी आणि कारखान्यात काम करण्यासाठी कामगारांची गरज भासू लागली. सैन्याला लागणारी विमाने, रणगाडे, शस्त्रास्त्रे, रायफली पुरवठा करणे खर्चिक होते. बहुतांशी जर्मन पुरुष नोकरी सोडून सैन्यात दाखल झाले होते. त्यामुळे कारखान्यात काम करणाऱ्या कामगारांचा तुटवडा निर्माण झाला.



(डचाऊमधील कैदी जर्मन सेनेसाठी रायफलचे उत्पादन करताना)

जर्मनीला हे प्रचंड काम कवडीमोल दरात करून हवे होते. ही कामे कैद्यांकडून करून घेण्याची कल्पना नाझींना सुचली. अश्याप्रकारे छळछावण्यांमधले लोक आयतेच गुलाम म्हणून नाझींना मिळाले.

१९४० सालापर्यंत नाझींनी ५,००० छळछावण्या सुरु केल्या. त्यात हजारेक छोट्या छावण्याही होत्या. पोलंडमधील ऑशविट्ज़, बिराकेनौ, माजडानेक, सोबिबॉर, तृब्लीन्का तर जर्मनीतील बुचेनवाल्ड, बर्गन-बेल्सन, डचाऊ आणि जाक्जेनहोसेन ह्या शहरातील छळछावण्या कुप्रसिध्द होत्या. साऱ्या युरोपमध्ये आणखीन छावण्या उभारण्यात आल्या. १९३० मध्ये सुरुवातीला छावणीचा वापर फक्त राजकीय विरोधकांना डांबण्यासाठी केला. त्यानंतर ज्यू, पोलिश आणि इतर गटातील लोकांची रवानगी छावणीत करण्यात आली. परिस्थिती इतकी वाईट होती की पुरुष, स्त्री किंवा संपूर्ण कुटुंब कुणालाही पकडून गेस्टापो घेऊन जायचे. आपलीही रवानगी छावणीत होईल ह्या भीतीने नाझींविरुद्ध आवाज उठवण्याची कुणाची हिंमत नव्हती.

जेव्हा नाझी पोलंड किंवा त्यांच्या ताब्यातील इतर देशातील घेट्टो (ज्यू लोकांची वस्ती) रिकामे करण्याचा आदेश देत तेव्हा पोलीस सगळ्यांना पकडून मालगाडीच्या डब्यामध्ये कोंबून घेऊन जायचे. मालगाडीच्या डब्यात ना बसण्याची सोय, ना पाणी,खाऊ, बाथरूम किंवा हिटरची सोय.



(कैद्यांना जनावरासारखी वागणूक दिली जायची. मालगाडीच्या डब्यात त्यांना ढकलून कोंबले जायचे.)

काही ज्यू लागणारे सामान बॅगेत घेऊन यायचे. पोलीस ते लगेच जप्त करत. सगळी माणसे छावणीत पोचली की त्यातील छोटी मुले, वृद्ध, आजारी माणसे ह्यांना वेगळे करून लगेचच गॅस चेंबरमध्ये नेऊन मारले जाई कारण त्यांचा नाझींना काही उपयोग नव्हता. त्यांना काम करण्यासाठी फक्त धडधाकट माणसे हवी होती.

जनावरासारखे लोकांना छावण्यांमध्ये कोंडून ठेवले जाई. त्यांची वैयक्तिक मालमत्ता जप्त करून युद्धासाठी आर्थिक मदत म्हणून जर्मनीत पाठवली जाई. कैद्यांच्या डोक्यावरचे सगळे केस काढून त्यांना आंघोळ घातली जाई आणि उवा होऊ नये म्हणून अंगावर औषध फवारले जाई.

सर्व कैद्यांना पट्टेरी सुती जाडेभरडे कपडे घालावे लागत. एका बराकीत सर्व पुरुष व मुलगे तर दुसऱ्या बराकीत स्त्रिया व मुलींना एकत्र ठेवले जाई. खायला कोरडा ब्रेड आणि पाणचट सूप असे बेचव आणि तेही अपुरे असे अन्न देत. भलेमोठे कुंपण आणि तैनात पहारेकरी त्यामुळे तिथून पळून जाणे निव्वळ अशक्य होते. त्यातही कुणी तसा प्रयत्न केलाच तर त्याला आणि त्याला मदत करणाऱ्या व्यक्तीला ताबडतोब गोळ्या घातल्या जात.

सगळ्यात मोठी छळछावणी असलेल्या ऑशविट्ज़मधील परिस्थिती प्रचंड वाईट होती. तिथे दररोज शंभरेक कैदी मृत्यू पावत. कुपोषण, उपासमार, गोळीबार, बेदम मारहाण, आजारपण ह्या कारणांनी बऱ्याच छावणीतील कैदी मरत होते. ऑशविट्ज़मधल्या कैद्यांची तर ठरवून हत्या होत होती.

ऑशविट्ज़मधील कैद्यांच्या डाव्या दंडावर कैदी नंबर गोंदवला जाई. त्यामुळे नाझीना आपापल्या छावणीतील प्रत्येक कैद्याचा रेकॉर्ड अचूक ठेवता यायचा. अशा प्रकारच्या हीन वागणुकीमुळे कैद्यांना नाल ठोकलेल्या जनावरासारखे वाटे. आता मरेपर्यंत काही आपली सुटका नाही हे त्यांना कळून चुकले होते.

शेकडो कैदी विषारी वायुने एकाच वेळी मृत्यू पावतील असे खास गॅस चेंबर बांधण्यात आले. ती प्रेते जाळण्यासाठी गॅस चेंबरच्या बाजूला भट्टीची सोय केली. तिथल्या दुर्गंधीयुक्त धुराने सारे आकाश काळे होऊन जायचे.

लेखक औली विसेल, तो १५ वर्षांचा असताना त्याला त्याच्या संपूर्ण कुटुंबियांसोबत १९४४ मध्ये ऑशविट्ज़च्या छावणीत नेण्यात आले. त्याने धुराने व्यापलेल्या आकाशाचे वर्णन आपल्या डायरीत लिहून ठेवले आहे.



(हॉलोकॉस्ट संग्रहालयातील प्रदर्शनातील एक फोटो, ऑशविट्ज़च्या कैद्यांची ओळख म्हणून गोंदवलेला कैदी नंबर)

१९४१ पासून हिटलरने ज्यूंची सामूहिकरीत्या हत्या सुरु केल्या. नाझी एसएसचा मुख्य हेनरीच हिमलर ह्याने ऑशविट्ज़च्या छळछावणीला भेट दिली. तेव्हा त्याच्या हातात नवीन हुकुम होता. "आपल्या सर्वेसर्वा नेत्याला ज्यूंच्या समस्येवर अचूक तोडगा सापडला आहे. आम्हाला एसएस म्हणून त्याचा हुकुम पाळावा लागेल...मी...ह्या कारणासाठी ऑशविट्ज़ची निवड केली आहे.

तो अचूक पर्याय म्हणजे गॅस चेंबरमधे ज्यू आणि नको असलेल्या लोकांचा संहार. बिर्केनौ, बेल्चे, सोबिबॉर ह्या ठिकाणच्या छावण्याची त्यासाठी निवड करण्यात आली.



(आज ऑशविट्ज़ गॅस चेंबरला हॉलोकॉस्टच्या यातनेतून गेलेले लोक पवित्र जागा मानतात)

"मी ती रात्र कधीही विसरू शकणार नाही..कॅम्पमधील पहिली रात्र...शांत निळ्या आकाशातील ते धुराचे लोट....तिथल्या लहानग्या मुलांचे चेहरे मी कधीच विसरू शकणार नाही ज्यांची कोवळी शरीरे मी काळ्याकुट्ट धुरात रुपांतर होताना पाहिली." विझेलची आई आणि धाकटी बहीणही ऑशविट्ज़च्या गॅस चेंबरमधे मृत्यू पावली.

बिरकेनौ इथे चार गॅस चेंबर होते. हा ऑशविट्ज़चाच भाग होता. तिथे रोज ८,००० लोक मारले जात होते. इतक्या सगळ्या लोकांना जाळण्याची क्षमता तिथल्या भट्ट्यांची नव्हती. त्यामुळे अनेक मृतदेह भल्या मोठ्या खड्ड्यात एकत्र गाडण्यात येत.

१९४१ पासून काही ठिकाणी तिथले पहारेकरी ज्यू कैद्यांना मोठ्या खड्ड्याच्या कडेला एका सरळ रेषेत उभे करीत. म्हणजे त्या कैद्यांना गोळ्या मारल्या की त्यांचे शव आपोआप त्या खड्ड्यात पडत असे. १९४२ मधे न्यूयॉर्क टाईम्सच्या बातमीनुसार लाट्विया, लिथुएनिया, एस्टोनिया एथील १००,००० ज्यूंना ह्या पद्धतीने मारण्यात आले. आणि एवढेच नाही तर पोलंडमधील १००,००० ज्यू, जर्मनीच्या ताब्यात असलेल्या रशियातील २००,००० ज्यूंनाही ह्याच अमानुष रीतीने ठार मारले.

कॅम्पमधे डांबण्यात आलेल्या प्रत्येक कैद्याची नाझींनी नोंद करून ठेवली होती. बेल्झेकमधे ६००,००० ज्यूंची हत्या केली. कॅम्प रिकामे झाले की नाझी ते तोडून टाकीत. त्यांनी केलेली भयानक कृत्ये लपवण्यासाठी तिथली सगळी जमीन नांगरून काढत. तिथे चांगली झाडेझुडपे लावत.



(जर्मनीचा पाडाव केल्यावर ब्रिटिश सैनिकांना बर्गेन-बेल्सनच्या छळछावणीत दिसलेला प्रेतांच्या खचाचा खड्डा)

छळछावण्या सुरु करून वर्ष होत नाही त्याच्या आतच जवळजवळ १०,००,००० ज्यू पुरुष, स्त्रिया, मुले ठार मारण्यात आली. पण हा ज्यूंचा मारण्याचा वेग नाझीना फारच कमी वाटला त्यामुळे त्यांनी आणखीन मृत्युच्या छावण्या बांधल्या. ज्या लोकांकडून छावण्या बांधण्याचे काम जबरदस्तीने करून घेण्यात आले त्यांना त्याच गॅस चेंबरमधे मारून टाकणे हे तर फारच क्रूर कृत्य होते.

# युद्ध शेवटाला आले असताना...

युद्ध समाप्तीकडे आले तसे नाझींनी आपल्या अमानुष कृत्याच्या खुणा नष्ट करण्यास सुरुवात केली. काही छावण्यांच्या जागेवर त्यांनी हिरव्यागार बागा बनवल्या. गॅस चेंबर मिटवून टाकली. भल्या मोठ्या खड्ड्यात ढिगांनी प्रेते पुरली होती ती बाहेर काढली आणि जाळून टाकली. पण सगळे पुरावे नष्ट करण्यात त्यांना यश आले नाही.



(नाझी अधिकाऱ्यांनी शिक्षेपासून स्वतःचा बचाव करण्यासाठी उध्वस्त केलेली छळछावणी)

ताब्यात घेतलेल्या राष्ट्रातील हजारो कैद्यांना जर्मनीत पाठवण्यात आले होते ज्याला कैदी मृत्यूचे लोंढे म्हणत. मित्रराष्ट्रे एकेक भाग जिंकत होती आणि त्यांनी तिथे जे काही पाहिले ते फारच धक्कादायक होते.

सर्वप्रथम रशियन सैन्याने जुलै १९४४ मधे पोलंडमधील माजदानेकची छळछावणी मुक्त केली. पश्चिमेकडून अमेरिकन आणि ब्रिटीश सैन्यदल जर्मनीत पोचले. तिथले भयंकर दृश्य पाहून सैनिक सुन्न झाले. बचावलेले स्त्री-पुरुष म्हणजे टोकाच्या उपासमारीचे बळी; निव्वळ जिवंत सांगाडे. चेहऱ्यावरची कातडी हाडांवर ओढली गेली होती. सगळीकडे दुर्गंधी व घाणीचे साम्राज्य. अमेरिकन जनरल ड्वाइट डी. ऐसेनहोवर ह्याने वॉशिंग्टन डी.सी. येथील नेत्यांना पाठवलेल्या पत्रात लिहिले होते, “मी इथे जे पाहायला मिळते आहे ते महाभयंकर आहे......उपासमारी, क्रूरता आणि पाशवी अत्याचार ह्याचे चित्र सहन होत नाही आहे.”

त्यातून वाचलेल्या लोकांची प्रकृती अतिशय नाजूक झाली होती. इतके दिवस उपाशी राहिल्यामुळे रोजचे साधे जेवण पचवण्याचीदेखील ताकद त्यांच्याकडे उरली नव्हती.



(कुपोषणाबरोबरच कैद्यांना टायफॉइड आणि जुलाब ह्या आजारांना तोंड द्यावे लागले)

त्यातील काही लोकांचा मृत्यू भरभर अधिक अन्न खाल्यामुळे झाला. त्यांचे शरीर इतके अन्न सहन करू शकले नाही. काहींची प्रकृती मरणासन्न असल्याने ते वाचू शकले नाही.

ब्रिटीश सैन्यदलाने बर्गन-बार्सनची छावणी मुक्त केली. त्यांच्याबरोबर असलेल्या लिओनार्डो बार्नेने म्हटले आहे, “शेकडो-हजारो उपाशी माणसे आम्ही त्यांना आमच्याजवळचा एकमेव अन्नसाठा, सैनिकांचा शिधा, खाण्यासाठी दिल्यामुळे मृत्यू पावली. पण असे काही घडू शकेल इतका पुढचा विचार करण्याइतकी मनस्थिती तरी कुठे कुणाची होती?”

जर्मनीने अधिकृतरीत्या शरणागती पत्करल्यावर दुसऱ्या महायुद्धाची ८ मे १९४५ रोजी समाप्ती झाली. ज्यू, पोलिश, स्लाव, जिप्सी, समाजवादी आणि जे कुणी नाझींना अपात्र वाटत होते अशा १ कोटी १० लाख लोकांची नाझींनी निर्दयी हत्या केली होती. युरोपमधील जवळजवळ दोन तृतीआंश ज्यू नागरिक हॉलोकॉस्टमधे मारले गेले होते. जे कोणी त्यातून वाचले त्यांची परिस्थिती भयानक होती. त्यांच्याकडे ना राहायला घर, ना पैसे, ना खाण्यासाठी अन्न आणि ना शरीरात काही ताकद. नाझींच्या ह्या “फायनल सोल्युशन” चे परिणाम शतकभर तरी युरोपवर राहिले होते.

## एक संस्मरणीय स्मारक

हॉलोकॉस्टला तीस वर्षे उलटून गेल्यावर अमेरिकेत हॉलोकॉस्ट संग्रहालय उभारण्याचे काम सुरु झाले. त्याआधी १९७८ साली राष्ट्राध्यक्ष जिमी कार्टर यांनी एली विझेल ह्यांच्या अध्यक्षतेखाली हॉलोकॉस्ट समिती स्थापन केली. ह्या समितीने तीन महत्वाच्या शिफारशी मांडल्या.



(२७ सप्टेंबर १९७९ रोजी अध्यक्ष एली विझेल (उजवीकडील) हॉलोकॉस्टविषयी बोलताना तसेच राष्ट्रपति कार्टरना समितीच्या शिफारशींची सविस्तर माहिती सांगताना)

सर्वात पहिली शिफारस होती की हॉलोकॉस्टमध्ये मृत झालेल्या तसेच त्यातून बचावलेल्या लोकांच्या स्मरणार्थ एक संग्रहालय बांधावे. ज्यांना हॉलोकॉस्टविषयी जास्त जाणून घ्यायचे आहे त्यांच्यासाठी एक अभ्यासकेंद्र उभारण्यात यावे अशी दुसरी शिफारस होती. आणि मृतांना श्रद्धांजली म्हणून अमेरिकेत एक राष्ट्रीय स्मरण दिन घोषित करावा अशी तिसरी शिफारस होती.

अमेरिकन सरकारने हॉलोकॉस्ट म्युझियम बांधण्यासाठी वॉशिंग्टन डीसी इथे नॅशनल मॉलजवळची दोन एकर जागा राखीव ठेवली. म्युझियमसाठी खाजगी देणग्या घेऊन निधी उभारण्यात आला. म्युझियमसाठी एकूण १६.८ कोटी खर्च अपेक्षित होता. त्यातील ९ कोटी मूळ इमारत बांधणीचा तर ७.८ कोटी प्रदर्शनासाठी होते. प्रकल्प वास्तूविशारद म्हणून जेम्स इंगो फ्रीडला नेमण्यात आले. तो नऊ वर्षांचा असताना कुटुंबीयांसोबत नाझींची नजर चुकवून जर्मनीतून पळून आला होता.

काम सुरु करण्याअगोदर फ्रीडने युरोपमधील छावण्यांना भेटी दिल्या. त्याने आराखडा बनवला त्यात हॉलोकॉस्ट संस्कृतीच्या तीन गोष्टी मांडल्या: *श्तेत्ल्स* म्हणजे पूर्व युरोपमधील ज्यू वस्त्या, छळछावणीचे स्थापत्य आणि वॉर्सा, लॉड्समधे ज्यूंना जबरदस्तीने कोंबले होते त्या घेट्टोच्या भिंती.



(जेम्स इंगो फ्रीडने तयार केलेल्या संग्रहालल्याच्या मॉडेलला १९९४ मध्ये अमेरिकन इन्स्टिट्यूट ऑफ आर्किटेक्चरचा विशेष पुरस्कार मिळाला)

फ्रीड म्हणाला, “माझे काम होते, दहशत आणि दु:ख ह्या भावना प्रतिबिंबित होईल अशी इमारत बांधणे. मला माहीत नाही अशी संवेदनशीलता जपणारी वास्तू उभारणे मला जमेल की नाही.”

फ्रीडने ह्या संग्रहालयासाठी तीन मजली इमारतीचा आराखडा तयार केला. ह्यात अभ्यास व संशोधन केंद्र आणि प्रदर्शन ह्यासाठी पुरेशी जागा ठेवण्यात आली होती. प्रदर्शन पाहून उचंबळून आलेल्या भावनांना मोकळे करण्यासाठी पूर्ण शांतता असेल असा एक मोठा हॉल होता.

१६ ऑक्टोबर १९८५ साली वेगवेगळ्या छळछावण्यातील माती आणि राख पुरून बांधकामाला सुरुवात केली. वर्षभराने वालेन्बर्ग ह्या स्वीडिश राजनैतिक अधिकाऱ्याच्या स्मरणार्थ म्युझियमसमोरील १५ व्या रस्त्याचे “रौल वालेन्बर्ग प्लेस” असे नामकरण करण्यात आले.

(प्रलय संग्रहालय वाशिंगटन, डीसी में नेशनल मॉल के पास स्थित है.)



वालेन्बर्गने हजारो ज्यूंचे जीव वाचवले होते. त्याने ज्यूंना स्वीडनमध्ये स्थलांतर करण्यासाठी मदत केली. त्यासाठीची आवश्यक कागदपत्रे त्याने तयार करून दिली. १९८८ साली राष्ट्राध्यक्ष रोनाल्ड रेगन ह्यांनी कोनशीला बसवली. एकीकडे प्रदर्शनात मांडता येणाऱ्या वस्तू जमवण्याचे काम जोरात सुरु होते.

१९९३ मधे हॉलोकॉस्ट म्युझियमचे काम पूर्ण झाले आणि एका स्वप्नाची पूर्तता झाली. अमेरिकन हॉलोकॉस्ट स्मारक संग्रहालयात २,६५,००० चौ.फु. (२३,८५० चौ.मी.) इतकी अवाढव्य जागा प्रदर्शनासाठी ठेवली होती.. तेवढ्या जागेत जवजवळ पाच फुटबॉल मैदाने मावली असती. हॉलोकॉस्टचे कायमस्वरूपी प्रदर्शन हे त्या म्युझियमचे प्रमुख आकर्षण होते. त्यात हॉलोकॉस्ट कसे घडले, कुठे काय झाले ह्यासंबंधीची अनेक कागदपत्रे, पुरावे, फोटो होते.

प्रदर्शनाची मांडणी तीन मजल्यांवर तीन भागात केली होती. प्रत्येक मजल्यावर एक भाग असे तीन भाग म्हणजे नाझींनी केलेले अन्वनित अत्याचार, फायनल सोल्युशन आणि लास्ट चाप्टर केले होते. पर्यटकांना हॉलोकॉस्टची थोडक्यात माहिती देण्याची ऑडिओ आणि व्हिडिओ द्वारे सोय केली होती.

हॉलोकॉस्टमध्ये १५ लाख मुले मारली गेली होती त्याच्या स्मरणार्थ “मुलांची भिंत” तळमजल्यावर उभारली होती. अमेरिकेतील मुलांनी त्यांना माहीत असलेले हॉलोकॉस्ट अशी कल्पना करून त्याची चित्रे टाईल्सवर काढली होती. अशा ३,००० हून जास्त टाईल्स भिंतीवर कायमस्वरूपात लावल्या होत्या. दरवर्षी म्युझियममध्ये विशेष प्रदर्शन लावले जाई.



("टॉवर ऑफ़ फेसेस" ही तीन मजली इमारतीएवढी खोली. तिथल्या भिंती आजच्या लिथुएनियातील एका गावातील लोकांच्या फोटोंनी सजल्या आहेत. हॉलोकॉस्टमधे २९ गावकऱ्यांखेरीज बाकीचे सर्व लोक मारले गेले होते)

असेच एक विशेष प्रदर्शन ॲन फ्रँकवर भरवले होते. तुम्हाला माहीत असेलच की ॲन फ्रँकला नाझींपासून जीव वाचवण्यासाठी कुटुंबियासह अनेक वर्षे ॲमस्टरडॅम, नेदरलँड्समध्ये एका गुप्तगृहात लपून राहावे लागले. दुसरे महायुद्ध संपल्यानंतर तिची डायरी सापडली. त्यात तिने तिचे अनुभव लिहिले होते. अजून एक विशेष प्रदर्शन अशा लपूनछपून राहिलेल्या मुलांवरच होते.



(प्रदर्शन पाहिल्यावर अनेक पर्यटकांना रडू आवरत नसे)

अनेक मित्रमंडळींनी, काही अनोळखी लोकांनी धोका पत्करून अनेक ज्यूंना नाझीपासून वाचवले होते. पकडले जाऊ नये म्हणून बरीच मुले गुप्तगृहात किंवा कपाटात लपून रहायची.

म्युझियम खुले झाल्यावर सुरुवातीच्या १४ वर्षात सुमारे २ कोटी ४० लाख पर्यटकांनी भेट दिली. हॉलोकॉस्टचे भीषण अनुभव समजून घेतले. त्यातील ८० लाख पर्यटक हे शाळकरी मुले होती. १ कोटी ७० लाख पर्यटक बिगरज्यू धर्माचे होते.

# न विसरण्याजोगे...

अमेरिकन हॉलोकॉस्ट मेमोरियल संग्रहालय सतत आठवण करून देते की अशा संहारक इतिहासाची पुनरावृत्ती होऊ देऊ नका. हा शांतीचा संदेश जास्तीत जास्त लोकांपर्यंत पोचावा यासाठी म्युझियमतर्फे शिक्षण आणि जागृतीचे कार्यक्रम म्युझियमबाहेरही राबवले जातात.

संग्रहालयात हॉलोकॉस्टमधून बचावलेल्या लोकांच्या करुण कहाण्या, मौखिक इतिहास रेकॉर्ड करून ठेवला आहे. पकडले जाऊ नये म्हणून तळघर किंवा, गुप्तगृहात कोंदट जागेत लपून राहिलेल्या लोकांच्या तसेच घरदार, कुटुंब, मित्र सारे काही हरवलेल्या लहान मुलांच्या असंख्य गोष्टी ऐकायला मिळतात.



(बचावलेल्या लोकांच्या प्राथमिक माहितीचे संकलन तसेच त्यांना एकमेकांशी जोडून देण्याचे काम संग्रहालय करते)

१९२६ सालचा जन्म असलेल्या हंगेरीतील बार्ट स्टर्नने म्हटले आहे, "ह्यातून मी जिवंत कसा राहिलो हा मोठा चमत्कारच म्हणायला हवा...मी प्रेतांच्या ढिगाऱ्यात लपून बसलो होतो...शेवटचा आठवडा होता..प्रेते जाळण्याच्या भट्ट्या बंद पडल्या होत्या." पोलंडच्या चार्लेन शिफने तिचा अनुभव सांगितला, "मी लपण्यासाठी जंगलाचा आसरा घेतला होता. तिथे किडे, अळ्या किंवा जे काही तोंडात टाकण्यासारखे दिसले ते ते खाल्ले."

संग्रहालयाच्या फिरत्या प्रदर्शनामुळे हॉलोकॉस्टची माहिती इतर ठिकाणीही पोचवता आली. जवळजवळ १० लाख लोकांनी ह्या फिरत्या प्रदर्शनाला भेट दिली. "मुलांना आठवताना : डॅनियलची गोष्ट" ही ह्या प्रदर्शनातील विशेष मांडणी होती. "डॅनियलची गोष्ट" ह्यात आठ व त्यावरील मुलांना नजरेसमोर ठेवून हॉलोकॉस्टची माहिती दाखवली आहे. नाझींनी जर्मनीचा ताबा घेतल्यावर तिथल्या ज्यूंचे आयुष्य कसे पालटून गेले हे दाखवले आहे. अकरा वर्षांच्या डॅनियलच्या नजरेतून ही गोष्ट सांगितली आहे.

शिक्षण हे हॉलोकॉस्ट संग्रहालयचे प्रमुख उद्दिष्ट आहे. मुलांना वर्गात हॉलोकॉस्टची माहिती कशी द्यायची ह्यासाठीच्या विशेष कार्यशाळा इथे शिक्षकांसाठी घेतल्या जातात. .

संग्रहालयात भावी सैन्य अधिकारी आणि कायद्याचे रक्षण करणारे अधिकारी ह्यांच्यासाठी लोकशाहीची मुल्ये कशी जपावी ह्यासाठी कार्यशाळा घेतल्या जातात. हॉलोकॉस्टच्या काळात कॅथॉलिक चर्चची काय भूमिका होती ह्यावर एक विशेष वर्ग चर्चच्या शिक्षकांसाठी घेतला जातो. हॉलोकॉस्टवरील साक्षरता सर्व स्तरांवर जाण्यासाठी म्युझियमचे शिक्षण केंद्र भरपूर मेहनत घेते.



(प्रदर्शना व्यतिरिक्त संग्रहालयात एक रिसर्च वाचनालय, दोन प्रेक्षागृहे, एक कॉम्पूटर सेंटर, वर्गखोल्या, एक स्मारकस्थळ आणि चर्चेसाठी खोल्या आहेत)

इतिहासातील भयंकर नरसंहाराच्या आठवणी जतन करणे ह्या मर्यादित हेतूने संग्रहालय काम करत नाही. जगात कुठेही अशा क्रूर सामुहिक मानवी हत्त्या होऊ नये ह्यासाठी संग्रहालय अनेक कार्यशाळा व कार्यक्रम आयोजित करते. २००४ मध्ये आफ्रिकेतील सुदान देशान दारफुरमधे जो नरसंहार सुरु झाला त्याविषयी म्युझियमने लोकांमध्ये जनजागृती करण्याचे महत्वाचे काम केले.



(2006 मध्ये , दारफुर आणि चाद येथील दृशांचे फोटो संग्रहालयाच्या भिंतींवर दाखवले गेले. आफ्रिकेतील देशांच्या भयानक परिस्थितीकडे लक्ष वेधले जावे यासाठीचा हा प्रयत्न होता.

हॉलोकॉस्ट म्युझियम पाहण्यासाठी वॉशिंग्टन डी.सी.ला येणे सर्वांना अर्थातच शक्य नाही. म्हणूनच अशा लोकांसाठी म्युझियमने ऑनलाईन भेटीची सुविधा उपलब्ध केली आहे. प्रत्यक्ष भेट दिल्यावर जी माहिती दिली जाते ती सगळी माहिती म्युझियमच्या वेबसाईटवर उपलब्ध आहे. लिखित माहिती, फोटो, व्हिडीओ असे सर्व दस्तावेज वेबसाईटवर जाऊन पाहता येतात.

अमेरिकन हॉलोकॉस्ट स्मारक संग्रहालय हेलावून टाकणारा खोल अनुभव देते. शांती, प्रेम ह्या मुल्यांवर प्रामाणिक काम करते. म्युझियमच्या लोकार्पण सोहळ्याच्या वेळी राष्ट्राध्यक्ष क्लिंटन म्हणाले, “मुल्ये नसलेले ज्ञान हे मानवजातीचा फक्त ऱ्हास करते हा मोठा धडा आपल्याला हॉलोकॉस्ट देतो. हृदयात प्रेम असलेली व्यक्तीच चांगला माणूस होऊ शकतो.”

हॉलोकॉस्ट म्युझियममुळे जगातील सर्व मानवजातीच्या हक्कांसाठी आणि कल्याणासाठी सगळ्यांनी एकत्र येऊन काम केले पाहिजे ही प्रेरणा मिळते.

## तुम्हाला माहीत आहे का?

- अमेरिकेतील शहरांमध्ये साधारण ६० हॉलोकॉस्ट म्युझियम आहेत
- म्युझियममध्ये पर्यटकांना ७० पेक्षा जास्त व्हिडिओजच्या सहाय्याने हॉलोकॉस्ट गोष्ट स्वरुपात दाखवले जाते
- म्युझियममध्ये १२,००० पेक्षा जास्त पुरावे आणि वस्तू तसेच ३ कोटी ७० लाख पानांचा ऐतिहासिक दस्तावेज आहे
- तिथल्या नोंदवहीत हॉलोकॉस्टमधून ५९ देशातील १९४,१९५ बचावलेले लोक आणि त्यांच्या कुटुंबियांची नोंद आहे
- साधारण ८,७०० लोकांच्या हॉलोकॉस्टच्या वैयक्तिक अनुभवाच्या कहाण्या व्हिडिओटेपमध्ये जतन केल्या आहेत
- कैद्यांना ज्या बंदिस्त डब्यामध्ये कोंबून छळछावणीमध्ये नेण्यात आले होते ते डब्बे पर्यटकांना पाहायला ठेवण्यात आले आहेत. तसेच वॉर्सातील घेट्टोच्या दगडी भिंतीची प्रतिकृती म्युझियममधील एका मजल्यावर तयार केली आहे
- अमेरिकन हॉलोकॉस्ट मेमोरियल कौन्सिलच्या सुचनेनुसार हॉलोकॉस्टमध्ये बळी गेलेल्या लोकांना दरवर्षी स्मरण दिनी मानवंदना दिली जाते. एप्रिल महिन्यातील एक दिवस ह्यासाठी राखून ठेवला आहे. इतर देशांमध्ये ऑशविट्ज़ मुक्त झाले तो २७ जानेवारी हा दिवस हॉलोकॉस्ट स्मरण दिन म्हणून साजरा केला जातो

## महत्वाची वर्षे

१९३३: ॲडॉल्फ हिटलरची जर्मनीचा चान्सलर म्हणून नियुक्ती आणि दचाऊ येथील पहिली छळछावणी खुली

१९३८: क्रिस्टलनाख्त "नाईट ऑफ ब्रोकन ग्लास" - ऑस्ट्रिया, जर्मनी आणि नाझींच्या नियंत्रणाखाली असलेल्या इतर देशांमध्ये ज्यूंच्या बंदोबस्तासाठी गुंडांनी केलेला हल्ला

१९३९: १ सप्टेंबरला जर्मनीचे पोलंडवर आक्रमण

१९४३: नाझींनी “फायनल सोल्युशन” ची तीव्रता वाढवली. ज्यूंचा सामुहिक नरसंहार सुरु. ऑशविट्ज़च्या छळछावणीची मुख्य छावणी म्हणून ह्यासाठी निवड

१९४४: सोवियत सैन्याकडून मजदानेकच्या छळछावणी मुक्त

१९४५: दुसरे महायुद्ध समाप्त

१९७८: राष्ट्राध्यक्ष जिमी कार्टर ह्यांची अमेरिकेत हॉलोकॉस्ट स्मारक उभारणीसाठी समिती स्थापन करण्याची सूचना

१९८५: अमेरिकन होलोकॉस्ट मेमोरियल म्युझियमचे भूमिपूजन

१९९३: म्युझियमचा लोकार्पण सोहळा, पर्यटकांसाठी खुले